मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र.८९२८/२०१५ व इतर याचिका यामध्ये दि. ६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासंदर्भात गठित मंत्रिमंडळ उपसमितीस मुदतवाढ.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : २३ जानेवारी, २०१९

वाचा- शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.बीसीसी २०१८/प्र.क्र.७२/१६-ब,दि.५ जुन,२०१८

प्रस्तावना-

मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र.८९२८/२०१५ (चेअरमन ॲन्ड मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरूद्ध जगदिश बालाराम बहिरा व इतर) व इतर याचिका यामध्ये दि.६ जुलै,२०१७ रोजी, अनुसूचीत जाती, अनुसूचीत जमाती , विजा-अ,भज-ब,भज-क,भज-ड,विशेष मागास प्रवर्ग अथवा इतर मागासवर्ग या जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही, असा निर्णय दिला आहे.मा.सर्वोच्च न्यायालयाच्या या निर्णयाची राज्यात अंमलबजावणी कशाप्रकारे व्हावी याबाबतची कार्यपध्दती निश्चित करण्यासाठी व शासनास शिफारस करण्यासाठी संदर्भाधिन शासन निर्णयान्वये मा.मंत्री,आदिवासी विकास यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उपसमिती स्थापन करण्यात आली आहे. सदर समितीच्या स्थापनेस मा.उच्च न्यायालय,खंडपीठ नागपूर यांनी रिट पिटिशन क्र.३१४०/२०१८ मध्ये दि.११.६.२०१८ रोजी अंतरिम आदेशान्वये स्थगिती दिल्याने मंत्रिमंडळ उपसमितीस विहित मुदतीत शासनास शिफारशी सादर करणे शक्य झाले नाही. मा.उच्च न्यायालयाने दि.२८.९.२०१८ रोजी समितीवरील स्थगिती उठविल्यामुळे शासनास शिफारशी सादर करण्यासाठी सदर समितीस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णय-

मा.मंत्री, आदिवासी विकास यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भाधिन शासन निर्णयान्वये गठित करण्यात आलेल्या मंत्रिमंडळ उपसमितीस शिफारशी सादर करण्यासाठी दि.३१ मार्च, २०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१९०१२३१२५८५८७७०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rasik Ambadas Khadse

Digitally signed by Rasik Ambadas Khadse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fdc00fa9bc45e4f7281973d193127b898 9dfa5df6a7a694b005e562ebd5c840e, serialNumber=a47200a14b42f151489f73f3e47c9 e8733991629b2302a3831b945146be88a80, cn=Rasik Ambadas Khadse
Date: 2019.01.23 13:11:22 +05'30'

**(र.अं.खडसे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) राज्यपाल यांचे सचिव,

२) मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव,

३) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

४) मा. विरोधी पक्षनेता,विधानपरिषद

५) मा. विरोधी पक्षनेता,विधानसभा

६) सर्व विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य

७) मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य.

८) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,

९) प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय(विधानसभा)

१०) प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय(विधानपरिषद)

११) सर्व विभागीय आयुक्त,

१२) सर्व जिल्हाधिकारी,

१३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

१४) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई,

१५) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,

१६) प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

१७) प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,नागपूर,औरंगाबाद,

१८) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

१९) सचिव,राज्य निवडणूक आयोग,

२०) सचिव,राज्य माहिती आयोग,

२१) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,

२२) राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,

२३) सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,

२४) सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका,

२५) संचालक, समाजकल्याण, पुणे,

२६) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,

२७) संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,

२८) संचालक, सेवायोजन, मुंबई,

२९) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,

३०) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,

३१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

३२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

३३) सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,

३४) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन मुंबई

३५) सर्व मान्यता प्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये,महाराष्ट्र राज्य,

३६) निवड नस्ती, कार्यासन १६-ब.